# चौथ्या नवतेचा शोध- (उत्तरार्ध)

चौथ्या नवतेचा शोध हा लेख लिहून जवळजवळ चार वर्षे पूर्ण झालीत. हा लेख मूलत: कवितासंग्रहाची प्रस्तावना म्हणून लिहिला होता; पण प्रस्तावना करण्यापेक्षा त्यामागे काही वेगळे हेतू होते. एक म्हणजे, स्वत:च्या काव्यविषयक प्रवासाचे सादरीकरण करणे, तर दुसरा हेतू स्वत:ची मुळे शोधत जाणे. दुर्दैवाने शब्दसंख्येच्या मर्यादेमुळे अनेक गोष्टींचे विश्लेषण करणे त्यावेळी शक्य झाले नाही. ह्या लेखाला मिळालेल्या प्रतिक्रिया दोन स्वरूपाच्या होत्या. एक प्रतिक्रिया होती अरुण म्हात्रे सारख्यांची. 'मूर्ख विधानांचा वस्तुपाठ' अशी प्रतिक्रिया त्यांनी 'सकाळ'मध्ये नोंदवली होती (नंतर ह्याच लेखातील मते इतरत्र सांगत त्यांनी त्यांची मुळे घट्ट नसल्याचे दाखवून दिले.) तर दुसरी होती शंकर सारडा प्रभृतींची 'विद्रोही साहित्याच्या नवा नारा' अशी ! एकीकडे नव्यांची (?) अक्षर चळवळ चालवणाऱ्या म्हात्रेंनी काहीशी सनातन भूमिका घ्यावी आणि दुसरीकडे सारडासारख्या सनातनी पारंपरिक भूमिका घेणाऱ्यांनी खुला दृष्टिकोन दाखवावा हे मराठी साहित्यव्यवहारातील आतापर्यंतच्या विरोधाभासाला साजेसेच होते. इतर सर्व प्रतिक्रिया ह्या दोन टोकांच्या दरम्यान हिंदकळत होत्या; मात्र सर्वच प्रतिक्रियावाल्यांना मी माझी मते अधिक स्पष्टपणे व विस्तृतपणे मांडावीत असे वाटले होते. त्यांना तो लेख त्रोटक वाटला होता. त्यांच्या ह्या मताला मान देऊन कधीतरी आधिक विश्लेषण करावे असे वाटत होते त्यानुसार हा लेख लिहिला आहे. प्रारंभी चौथ्या नवतेची सुरुवात समीक्षेपासून का ह्याचे विश्लेषण करणे आवश्यक वाटते.

माझ्या चौथ्या नवतेच्या शोधावर अनेक आक्षेप घेण्यात आलेत आणि येत आहेत. त्यांतील दोन महत्त्वाच्या आक्षेपांपासूनच मी सुरुवात करतो.

**पहिला आक्षेप :** 'चौथी नवता, चौथी नवता म्हणून तू जी बोंबाबोंब चालवलीयेस ती मुळात अस्तित्वात आहेच कुठे ? ती केवळ तुझ्या डोक्यात आहे. तुझ्या आसपासच्या एकाही तरुण साहित्यिकाच्या डोक्यात ती नाही.'

**दुसरा आक्षेप :** 'तुझी ही चौथी नवता साहित्यात कुठे आहे ? चौथ्या नवतेचे साहित्य अस्तित्वात तरी आहे का ? असेल तर दाखव, नाहीतर चौथी नवता अस्तित्वातच नाही हे कबूल कर.' थोडक्यात, बाप दाखव नाहीतर श्राद्ध कर.

ह्यातील पहिला आक्षेप हा उघड उघड देशीवादी नवतेला पार्श्वभूमीवर ठेवून घेण्यात येतो

हे स्पष्ट आहे. आधुनिक काळातील ही तिसरी नवता एका समूहाने लघुनियतकालिकांतून संघटितरीत्या उभी केली. मराठीतील चौथी नवता हीदेखील अशीच समूहाने उभी करावी असा अट्टाहास त्यामुळेच काहींना योग्य वाटतो; पण तो योग्य नव्हे. प्रत्येकवेळी नवता कोरसमध्येच सुरुवात करेल असे नाही. माझ्याबरोबर आणखी काही लोक असते तर मला आनंदच वाटला असता; पण दुर्दैवाने माझ्या समकालीन लोकांचे पाय हे दुसऱ्या आणि तिसऱ्या नवतेतच अडकलेत. खुद्द मी ज्या 'अभिधा' ह्या मासिकाचा संपादक आहे तिथेही बाकीच्यांचे पाय अजून मोकळे झालेले नाहीत. मला काय म्हणायच आहे ते आता आता त्यांच्या लक्षात येऊ लागलंय; सत्तरनंतर जन्मलेल्या पिढीस मात्र सहजरित्या मला काय म्हणायचे आहे ते कळते; अर्थात त्यामुळे फार काही बिघडते असे नव्हे. मराठीतील आदि नवता ही व्यक्तीपासून सुरू होत नंतर समूहात पसरली आहे. ही नवता ज्ञानेश्वर ह्या व्यक्तीपासून सुरू होते. कुणीतरी सुरुवात करावी लागते. माझे लेखन ही सुरुवात आहे. मात्र ज्ञानेश्वरांची ताकद माझ्याजवळ नाही. त्यांनी ज्ञानेश्वरी लिहून वारकरी चळवळीचा दार्शनिक पाया भरभक्कमपणे घातला. माझ्यामुळे पाया घातला जाईल की नाही ह्याची कल्पना नाही; पण निदान कागदावर स्थापत्याची आखणी तरी व्हावी असे वाटते. मराठी साहित्याची कोंडी फोडण्याचा हाच एक मार्ग आहे. समकालीन वास्तवाकडे डोळे फिरवून बसणाऱ्यांच्या डोळ्यांवरील एखाद-दुसरी झापड जरी ह्यामुळे निघाली तरी चिक्कार झाले.

ही क्रांती फक्त माझ्या डोक्यात आहे. हा पहिल्या आक्षेपाचा उत्तरार्ध आणि दुसरा आक्षेप यांचा एकत्रच विचार करू. प्रथम आपण 'टीकास्वयंवर'मधील भालचंद्र नेमाडे यांच्या समीक्षेकडे पाहण्याच्या दृष्टिकोनाचा विचार करू. भालचंद्र नेमाडे ह्या पुस्तकाच्या प्रस्तावनेत म्हणतात. *''वस्तुत: टीका लिहिणे ही साहित्यव्यवहारावरची ऐतखाऊ क्रिया असून साहित्याचे उत्पादन हीसुद्धा जगण्यावरची तशीच परजीवी क्रिया आहे''*. थोडक्यात, प्रथम जगणे, नंतर साहित्य, त्यानंतर समीक्षा अशी स्तरीय रचना त्यांनी स्वीकारली आहे. मराठीतील जवळ जवळ सर्वांनाच ही रचना मान्य आहे. कलावंतांना तर त्यांचा अहंकार सुखावत असल्याने ही गोष्ट अधिकच मान्य आहे. प्रथम साहित्य निर्माण होते आणि नंतर समीक्षा निर्माण होते. कलावंताच्या कलेवर पोसली गेलेली बांडगुळे म्हणजे समीक्षक वगैरे मते सर्वच कलावंत बाळगत असतात. थोडक्यात, आम्ही आहोत म्हणून समीक्षक आहेत, असा हा अहंकारी भाव आहे. प्रत्यक्ष वस्तुस्थिती अशी आहे का ?

सर्व मानवी साहित्याचा इतिहास तपासला तर एक गोष्ट स्पष्ट दिसते ती म्हणजे प्रथम दर्शने किंवा तत्त्वज्ञाने निर्माण झाली आणि त्यानंतर त्यावर आधारित साहित्य निर्माण झाले.

वाल्मिकी आणि व्यास ह्यांच्याकडे प्रथम जीवनदृष्टी होती. त्यांचे स्वत:चे दर्शन होते (मी दर्शन आणि तत्त्वज्ञान हे दोन शब्द जाणीवपूर्वक वेगवेगळे वापरत आहे. भारतीय परंपरेत जीवनदृष्टीला 'दर्शन' म्हणतात आणि तेच योग्य आहे. ज्यांना मोक्ष मिळाला आहे ते दर्शन निर्माण करतात. उदा. काही उपनिषदे बुद्ध दर्शन, जीन दर्शन, शंकर दर्शन तर काही लोक पण्डित असतात ते तत्त्वज्ञान निर्माण करतात. उदा. मार्क्स, रसेल, मे. पु. रेगे जे मोक्षाची साधना करतात त्यांची निर्मिती ही काही प्रमाणात दार्शनिक असते तर काही प्रमाणात तत्त्वज्ञानात्मक. माझी निर्मिती ही अशी आहे. सविकल्प समाधीपर्यंत पोहोचल्याने मला सत्याचे दर्शन झाले आहे. पण नंतर साधन मार्गावरून पतीत झाल्याने मी मोक्षाला उपलब्ध न होता तृष्णांच्या चिखलात सध्या लोळतो आहे. त्यामुळे मी जे काही सांगतो ते अर्धदर्शनच आहे) त्यामुळेच प्रथम जीवन, त्यानंतर जीवनदृष्टी, त्यानंतर साहित्य असा क्रम आहे. प्रथम किर्केगार्द - नित्शे यांचे तत्त्वज्ञान, नंतर अस्तित्ववादी साहित्य, प्रथम मार्क्सवाद नंतर सुर्वे. कित्येकदा तर प्रथम जीवनदृष्टी नंतर त्यानुसार जीवन घडवण्याचा प्रयत्न केला जातो. उदा. मार्क्सवाद, त्यानंतर मार्क्सवादी कॉम्रेड जीवनशैली. मराठीत जेव्हा ज्ञानेश्वर प्रथम लिहायला बसले तेव्हा त्यांच्यापुढचा सर्वांत महत्त्वाचा प्रश्न साहित्यिक नव्हता तर दार्शनिक होता. ज्ञानेश्वरांचे मराठीला मिळालेले सर्वांत मोठे योगदान हे साहित्यिक नाही तर दार्शनिक आहे. ज्ञानेश्वरानंतर मराठीत दर्शनाचा अक्षरश: ठणठणाट आहे. तुकारामच ह्याला काही प्रमाणात अपवाद म्हणता येईल. पण मुळात स्वतंत्र दर्शनशास्त्र जन्माला घालण्याची प्रतिभा तुकोबाजवळ नव्हती. त्यामुळेच 'ज्ञानेश्वरी' आणि 'अमृतानुभव' हे दोनच ग्रंथ मराठीत दर्शनशास्त्राच्या संदर्भात महत्त्वाचे आहेत. त्याच्या आसपास कदाचित महानुभव आणि रामदासी जाऊ शकतील; पण रामदास अर्धदार्शनिकच वाटतात. ज्ञानेश्वरांनी एकीकडे ज्ञानेश्वरी आणि अमृतानुभव लिहून वारकरी चळवळीचा दार्शनिक पाया घातला तर अभंग व पदे लिहून साहित्यिक चळवळीची वाट मोकळी केली.

मराठीतील ह्यानंतरची दुसरी महत्त्वाची चळवळ प्रबोधनवादी साहित्याची होती. आधुनिक कालखण्डातील ह्या पहिल्या नवतेचे प्रवर्तक होते महात्मा ज्योतिबा फुले; पण दुर्दैवाने ब्रिटिश कालखंडातील सर्व वाङ्मयीन एजन्सीज ब्राह्मणांनी ताब्यात घेतल्याने फुल्यांचे श्रेय त्यांना मिळाले नाही. सत्यदीपिका मासिकाच्या जून १८६९ च्या अंकात ज्योतिबांनी लिहिलेला 'विद्याखात्यातील ब्राम्हण पंतोजी' हा पवाडा ही मराठीतील पहिली प्रबोधनवादी कविता होती. त्यानंतरही ज्योतिबांनी अनेक अभंग लिहिले. ज्योतिबा हे कवी म्हणून थोर नसले तरी लक्षणीय होते. त्यांची जीवनदृष्टी ही खास त्यांची होती. तिच्यावरही वसाहतवादाचे संस्कारण होते पण तरीही वैयक्तिक अनुभवांची

तिला खास मितीही होती. त्यांनीही ज्ञानेश्वरांप्रमाणेच एकीकडे जीवनदृष्टी निर्माण केली तर दुसरीकडे साहित्यनिर्मिती; पण मराठीच्या दुर्दैवाने ज्योतिबांकडे कुणी लक्ष दिले नाही आणि मराठीतील अर्वाचीन कवितेचे जनक होण्याचे श्रेय केशवसुत ह्या फालतू कवीला मिळाले. वास्तविक केशवसुतांना थोरपण दिले जाण्याचे एकमेव कारण त्यांनी आधुनिक आशय प्रथम मांडला हेच आहे; पण केशवसुतांचा हा अधिकार त्यांचा मुळीच नाही. केशवसुतांच्या नव्या शिपायापेक्षा ज्योतिबांचे सहिष्णुतेचे अभंग हे आधिक अस्सल होते. 'मजुरावर उपासमारीची पाळी' पेक्षा फुल्यांचे शुद्रासंदर्भातले अभंग अधिक अस्सल होते. केशवसुतांचा तथाकथित स्वर्गसमक्षतेपेक्षा ज्योतिबांचा निर्मिक आधिक अस्सल होता; पण ब्राह्मण जाणिवेच्या समीक्षकांनी ज्योतिबांकडे साफ दुर्लक्ष्य केले आणि एक वसाहतवादाला संपूर्ण बळी पडलेला ब्रिटिश आशयाची उसनवारी करणारा कवी मराठी प्रबोधनवादी कवितेचा जनक ठरला. केशवसुतांचे असे मराठी कवितेच्या केंद्रस्थानी येणे हा मराठी कवितेला शाप ठरला. त्याचे खालील दुष्परिणाम झाले.

(१) ब्रिटिश कालखंडात सर्वच प्रबोधनवादी चळवळींना देशी आकार देण्याचे प्रयत्न सुरू झाले. प्रबोधनाचा हा देशी आकार साहित्यात देशीयतेच्या रूपात प्रकट होणे अत्यंत आवश्यक होते. केशवसुतांना हा देशी आकार कधीच नीट उमगला नाही. ह्याउलट बंगालमध्ये रवींद्रनाथ ठाकुरांनी आपल्या साहित्यात हे देशीयतेचे भान कधीच सोडले नाही. परिणामी बंगाली साहित्य हे उत्तम झाले, तर मराठीत मात्र आरंभीच कवितेला घरघर लागली. वसाहतवादाला ती वाजवीपेक्षा जास्त बळी पडली.

(२) केशवसुतांची प्रतिभा दुय्यम दर्जाची होती. त्यामुळे त्यांची कविता दुय्यम दर्जाची झाली. ही दुय्यम दर्जाची कविता केंद्रस्थानी आल्याने तिचे अनुकरण करणाऱ्यांनीही दुय्यम दर्जाची कविताच जन्माला घातली.

(३) केशवसुतांनीच मराठीत आयती जीवनदृष्टी, आयते आकृतिबंध कसलाही विवेक न बाळगता आयात करून उधार-उसनवारीची एक परंपराच निर्माण केली. ज्या तत्त्वज्ञानाने ब्रिटिश रोमॅन्टिसिझम जन्माला घातला त्या तत्त्वज्ञानाविषयीचे केशवसुतांचे आकलन अत्यंत त्रोटक आणि उथळ होते. त्रोटक आणि उथळ जीवनदृष्टीची ही परंपरा पुढेही चालू राहिली.

थोडक्यात, मराठी साहित्याचे केशवसुत हे नायक न ठरता खलनायक ठरले. त्यांच्यामुळेच प्रथम कविता जन्मते आणि मग समीक्षक त्या कवीची जीवनदृष्टी शोधून काढतात असा गैरसमज निर्माण झाला. वास्तविक इथेही ब्रिटिश रोमॅन्टिसिझमची जीवनदृष्टी आधी आणि नंतर केशवसुतांची

कविता असाच क्रम होता.

ह्या पार्श्वभूमीवर माझ्यावरील आक्षेपांचा विचार करू. प्रथम चौथी नवता माझ्या डोक्यात आहे हा आक्षेप. कुठलीही नवता ही जीवनदृष्टीतून निर्माण होते. जीवनदृष्टी प्रथम डोक्यातच निर्माण होते. त्यामुळे चौथी नवता माझ्या डोक्यात आहे ह्यात चुकीचे ते काय आहे ? मराठीतील केशवसुती, मर्ढेकरी आणि देशीवादी ह्या तिन्ही नवतांतील जीवनदृष्टी ही युरोपियनांकडून उधार आणली आहे. साहजिकच जीवनदृष्टी युरोपात आणि त्यावर आधारित साहित्य मात्र मराठीत अशी दुभंगणी निर्माण झाली. मर्ढेकरांची जीवनदृष्टी ही इलियट व त्याच्या समकालिनांनी आयतीच त्यांना दिली. देशीवाद्यांना देशीवादी जीवनदृष्टी अशीच क्लोद लेव्ही स्टाऊस वगैरेंच्या मानवशास्त्राने, तिथल्या देशीवाद्यांनी, ॲन्टीकलोनियलीझमवाल्यांनी, मार्क्सवाद्यांनी आणि अस्तित्ववाद्यांनी आयतीच पुरवली.

ह्या पार्श्वभूमीवर मी जेव्हा साहित्यविश्वात प्रवेश केला तेव्हा नवीनच प्रश्न उभे ठाकले. मुळात मी साहित्यात प्रवेश केला तेव्हाच माझी जीवनदृष्टी तयार होती. आयुष्यात मी प्रथम तत्त्वज्ञ वाचला तो विवेकानंद. त्यानंतर मी साधनेस सुरुवात केली. मोक्षाच्या ह्या साधनेतच मला माझी जीवनदृष्टी सापडली. खुद्द विवेकानंदांपासूनही मी काही बाबतीत दूर झालो. ही जीवनदृष्टी घेऊन मी साहित्यात प्रवेश केला आणि मराठी साहित्यात काही मूलभूत गोष्टींबाबतच घोळ आहेत हे माझ्या हळुहळू लक्षात आले. विशेषत: २० व्या शतकातील कुठल्याच महत्त्वाच्या समजल्या जाणाऱ्या साहित्यिकाकडे जीवनदृष्टीच नाहीये किंवा जी आहे ती उधार-उसनवारीतून आलीआहे हे माझ्या लक्षात आले. याच वेळी कलावंत म्हणून मला जे व्यक्त करायचे होते त्यासाठी केशवसुती, मर्ढेकरी आणि देशीवादी ह्या तिन्ही परांपरांमागच्या जीवनदृष्ट्या पूर्ण निकामी आहेत, हे माझ्या लक्षात आले. मी वयाच्या सोळाव्या वर्षापासून तत्त्वज्ञानाचा अभ्यास करत होतो त्यामुळे पाश्चात्त्य तत्त्वज्ञानाची दिवाळखोरी मला चांगली परिचयाची होती. माझ्या आधीच्या साहित्यिकांना जी पाश्चात्त्यांची उसनवारी शक्य होती, ती मला भावणे शक्य नव्हते आणि मला तशी गरजही वाटली नाही. माझ्या दृष्टीने बुद्ध, महावीर, शंकराचार्य ह्यांनी आरंभीचे काम करून ठेवले होते आणि कृष्णमूर्ती आणि रजनीश यांनी भारतीय दर्शनशास्त्राला आणखी काही मित्या बहाल केल्या होत्या. ह्या सर्वांशी कधी जुळवून घेत तर कधी मतभेद नोंदवत माझी जीवनदृष्टी आकार घेत होती. ह्याला मुख्य आधार होता माझ्या साधनामार्गाचा. भविष्यात येऊ घातलेल्या जीवनशैलीला साहित्यात व्यक्त कसे करायचे हा माझा प्रश्न मराठीतील साहित्यपरंपरांनी सोडवावा अशी माझी अपेक्षा होती. पण दुर्दैवाने ती पुरी झाली नाही. याच वेळी मी रशियातील

मार्क्सवाद कोसळेल हे १९८० साली वर्तवलेले भविष्य माझ्या अपेक्षेपेक्षा जास्तच लवकर खरे झाले आणि भविष्यकालीन वास्तव हा हा म्हणता वर्तमानकालीन झाले. मला अपेक्षित असलेले ग्लोबलायझेशन आणि प्रसार माध्यमांचा दबाव अपेक्षेपेक्षा अधिक वेगाने विस्तारला. मुळातच संस्कृतीतील देशीयता हा काही फार महत्त्वाचा घटक मला वाटत नव्हता. नेमाडेंची देशीयतेची संकल्पना त्यामुळे मला मान्यच नव्हती. अस्तित्वात आलेले वास्तव व्यक्त करायचे असेल तर ह्या वास्तवाकडे पाहण्याची नवीन जीवनदृष्टी प्रथम निर्माण करावी लागेल. थोडक्यात, चौथ्या नवतेची ज्ञानेश्वरी प्रथम निर्माण केली पाहिजे हे माझ्या लक्षात आले आणि मी समीक्षेकडे वळलो. माझी समीक्षा रूढार्थाने समीक्षा नाही, तर ती जीवनदृष्टीची मांडणी आहे. साहित्यिकाने दार्शनिक असू नये हा वसाहतवादाने निर्माण केलेला गंड माझ्यात नव्हता. खुद्द माझाच साहित्यिक बाप संत ज्ञानेश्वर ह्याने आठशे वर्षापूर्वी साहित्यिकाने प्रथम दार्शनिकच असले पाहिजे हे मला आवर्जून सांगितले होते. ज्ञानेश्वरांप्रमाणेच मलाही कुठलाही युरोपियन बाप त्याचे दर्शन, त्याचे तत्त्वज्ञान उसने देणार नव्हता. ज्ञानेश्वरांप्रमाणेच मलाही माझे पसायदान विश्वासाठीच मागायचे होते. कुठल्याही देशीयतेत ते बांधून घेऊन मर्यादित करायचे नव्हते. नामदेव त्याला ज्ञात असलेल्या भूगोलात हिंडताना वेळप्रसंगी त्या त्या भूगोलाच्या भाषेत रचना करताना मला दिसला होता. नामदेव इंग्लंडमध्ये गेला असता तर त्याने इंग्लिशमधून अभंग लिहिले असते ह्याविषयी माझ्या मनात शंका नव्हती. थोडक्यात, देशीयता आणि देशीवाद मला कोणत्याही अर्थाने मान्य नव्हता आणि इथेच चौथ्या नवतेच्या मांडणीची सुरुवात झाली.

आज जेव्हा लोक मला प्रश्न विचारतात की चौथ्या नवतेचे साहित्य अस्तित्वात आहेच कुठं ? तेव्हा त्यांना प्रथम साहित्य आणि नंतर जीवनदृष्टी असा अनुक्रम अभिप्रेत असतो. केशवसुती, मर्ढेकरी आणि देशीवादी ह्या युरोपियन जीवनदृष्टीला बळी पडलेल्या तिन्ही नवतांनी त्यांना लावलेली सवय हा प्रश्न विचार करायला मजबूर करते. ह्या तीन नवतांबाबतचा एक विनोद त्यांच्या लक्षात येत नाही म्हणजे असे की, ह्या तीन नवतेतील साहित्यिक प्रथम तिकडच्या जीवनदृष्टीतून आपले साहित्य निर्माण करतात आणि मग आपले समीक्षक त्याच साहित्यातून ती युरोपियन जीवनदृष्टी कशी प्रकट होते ते शोधून काढतात. एखाद्याने आपल्या जेनेटिक कोडाच्या आकलनातून शरीर निर्माण करण्याऐवजी दुसऱ्याचे जेनेटिक कोड घेऊन आपल्या गर्भाशयात मूल निर्माण करून वाढवावे आणि नंतर डॉक्टर लोकांनी त्याच्या शरीरात कसे दुसऱ्याचे जेनेटिक कोड आढळते ते शरीरातून शोधून काढावे तशातला हा प्रकार आहे आणि गेली शंभर वर्षे मराठीत हा प्रकार बिनबोभाट चालू आहे. केशवसुतांनी स्वातंत्र्य, समता, बंधुता, व्यक्तिवाद वगैरेवर आधारित

ब्रिटिश जीवनदृष्टीतून कविता निर्माण करायची आणि मग इथल्या समीक्षकांनी ज्योतिबांकडे सोयीस्कर दुर्लक्ष करत केशवसुतांच्या कवितेत स्वातंत्र्य, समता, बंधुता वगैरे जीवनमूल्ये आढळत असल्याने ते कसे अर्वाचीन कवितेचे जनक आहेत ते सिद्ध करायचे. मर्ढेकरांनी टी. एस. इलियटच्या कविता वाचायच्या. यंत्रयुगातील मानवाची हताशता व वैफल्य, विश्वात त्याला लाभलेले नगण्य स्थान, अध्यात्म्याशी नव्याने नाते जोडण्याचा प्रयत्न वगैरे गोष्टी तिथल्या जीवनदृष्टीतून घेऊन आपली कविता उभी करायची आणि मग ह्याच गोष्टी त्यांच्या कवितेत कशा आढळतात ते इथल्या समीक्षकांनी सिद्ध करायचे आणि त्यांना नवकाव्याचे प्रवर्तक ठरवायचे. देशीवाद्यांनी युरोपियन मानवशास्त्रज्ञ, अस्तित्ववादी तत्त्वज्ञान, देशीवाद, मार्क्सवाद आणि ॲन्टीकलोनियॅलिझम यांची संकरित जीवनदृष्टी उसनी घेऊन आपली कविता उभी करायची आणि मग इथल्या समीक्षकांनी ह्याच गोष्टी त्यात कशा आढळतात ते शोधून काढायचे हे गेली शंभर वर्षे इथे चालूच आहे. कृपया मी आयातीला आणि प्रभावाला विरोध करतो असा कुणी गैरसमज करून घेऊ नये. त्यांच्याकडचे जे जे वैज्ञानिक आहे, वैश्विक आहे ते ते आपण घ्यायलाच हवे; मात्र प्रत्येक व्यक्तीची जीवनदृष्टी ही तिच्या व्यक्तिमत्त्वातून उभी रहायला हवी. ह्या व्यक्तीने जसे देशीयतेला बळी पडू नये असे मला वाटते तसेच अविवेकी आणि उथळ उसनवारीलाही बळी पडे नये असे मला वाटते. मराठीतील तिन्ही नवता ह्या अशा उसनवारीला बळी पडलेत, म्हणूनच त्यांची कडक तपासणी करण्याची गरज आज निर्माण झाली आहे.

थोडक्यात, चौथी नवता स्वत:ची सुरुवात समीक्षेपासून करून नवी जीवनदृष्टी निर्माण करण्याचे आव्हान स्वीकारत नवीन साहित्याची निर्मिती करते. किंबहुना समकालीन वास्तवाने तिच्यावर तशी सक्तीच केली आहे. तेव्हा चौथ्या नवतेचे साहित्य कुठे आहे, असे विचारणाऱ्यांना माझे उत्तर हेच आहे की, आधीच्या नवतांनी शीर्षासने करून (म्हणजे डोके युरोपात खुपसून) हातावर चालण्याची वाटचाल पत्करली तशी वाटचाल आमच्याकडून अपेक्षू नका. आम्ही जीवनदृष्टी आधी नंतर साहित्य ह्या नैसर्गिक क्रमानेच वाटचाल करत आहोत.

ह्या विवेचनातून एक मूलभूत प्रश्न असा निर्माण होतो की, आमच्या पिढीवर अशी सक्ती का झाली आहे ? ह्या प्रश्नाचे उत्तर इतिहासातील विकासाचा, अंतरायाचा लोप आणि वास्तवाचे आंतरराष्ट्रीय दळणवळण आहे. मागील पिढ्यांना इतिहासातील विकासाच्या अंतरायाच्या लोपाचा फारच फायदा झाला. म्हणजे असे की, युरोप आणि भारत यांच्यातील विकासाचा अंतराय इतका प्रचंड मोठा होता की ज्या गोष्टी प्रथम युरोपात घडत त्या भारतात घडून यायला आणखी पन्नास वर्षे जावी लागत. परिणामी युरोपमधली जुनाट सिद्धांतने नंतर पन्नास वर्षांनी इथे समकालीन

वास्तवाला अनुरूप करून घेऊन ती कॅश करून घेणे मागच्या पिढ्यांना चांगले साधले. कुठलेही तत्वज्ञान आणि पद्धत प्रथम तिकडे जन्मे आणि मग इथले विचारवंत पन्नास वर्षांनी त्याची भारतात तालीम करत. आमच्या पिढीत ही संधी उपलब्ध नाही. संगणकीय क्रांतीने ह्याबाबतीतले सारेच अंतराय कमी करायला सुरुवात केली आहे. त्यामुळे तिकडे काहीही नवीन झाले की ते आता दोन-तीन वर्षातच इथे येते. संगणकतज्ज्ञांच्या मते हे दोन-तीन वर्षाचे अंतरही लवकरच भरून निघेल. ह्या संगणकीय क्रांतीबरोबरच दुसरी मोठी क्रांती घडून आली ती म्हणजे 'मेडिया रिवोल्युशन'. प्रसारमाध्यमांचा प्रसार इतका प्रचंड वाढत चाललाय की जगात कुठेही काहीही घडले तरी मी ते याची देही याची डोळा आता ताबडतोब पाहू शकतो. टीव्हीने वास्तवाची आंतरराष्ट्रीय देवाणघेवाण ही अक्षरशः पोरखेळ बनवली आहे. याचबरोबर वर्तमानपत्रांची झालेली संख्यात्मक व गुणवत्तात्मक वाढ आणि आंतरराष्ट्रीय प्रकाशनसंस्थांचे झालेले आगमन ह्यांनी ही देवाणघेवाणीची गती अधिकच तीव्र केली आहे. वास्तवांचा असा धुवाँधार पाऊस रोज कोसळत असताना रोज युरोपमधून एखादी छत्री आणून त्याच्याशी मुकाबला करणे आता शक्य नाही. तुम्हाला स्वत:ची तुमची जीवनदृष्टीच निर्माण करूनच ह्या सततच्या बदलत्या वास्तवाला सामोरे जावे लागेल. वास्तवात सतत होणारा बदल हा या नव्या जगाचा युगधर्म आहे. देशीयतेसारखी स्टॅटिक बाब पकडून तुम्ही ह्या बदलांना सामोरे जाऊ शकत नाही. ह्या बदलात जे बदलतात ते टिकतात. जे बदलत नाहीत ते टिकत नाहीत असा हा संगणकीय डार्विनवाद आहे.

एकीकडे वास्तवाची आंतरराष्ट्रीय देवाणघेवाण सुरू असताना तुमच्या आसपासचे वास्तवही आंतरराष्ट्रीय झाले आहे. गॅटची धोरणे, ग्लोबल व्हिलेजचे अवतीर्ण होणे. आयात-निर्यातीच्या तंत्रज्ञानात झालेल्या प्रचंड सुधारणा आणि आंतरराष्ट्रीय अर्थव्यवस्थेशी प्रत्येक समाजव्यवस्था जोडली जाणे ह्यामुळे तुम्ही खाता ते अन्न, घालता ते कपडे, राहता ते घर, तुमचे आरोग्य व आरोग्यसेवा आणि तुमची शिक्षण व्यवस्था ह्यांपैकी आता काहीही देशी राहिले नाही. ह्याबाबतचे तपशीलवार विवेचन देशीयता वास्तव आणि आभास ह्या पुढील निबंधात केले आहे. त्यामुळे ह्या आंतरराष्ट्रीय वास्तवाची कलेत मांडणी करायची असेल तर देशीवादी जीवनदृष्टी अपुरी पडते. नव्या विश्ववादी मांडणीचा शोध त्यामुळेच अपरिहार्य ठरतो. थोडक्यात, ह्या बदललेल्या पर्यावरणानेच चौथ्या नवतेच्या निर्मितीची आणि त्यासाठी आवश्यक असलेल्या नव्या जीवनदृष्टीची गरज निर्माण केली आहे.

ह्या पार्श्वभूमीवर आता समीक्षा ही साहित्यावर वाढणारी ऐतखाऊ क्रिया आहे ह्या नेमाडे यांच्या मताकडे पाहू. एक गोष्ट इथे प्रथम स्पष्ट केली पाहिजे. समीक्षा ही केवळ साहित्यकृतीची

नसते तर ती समाजाची, शासनसंस्थेची कशाचीही असू शकते. जेव्हा एखादा साहित्यिक साहित्य लिहितो तेव्हा ती त्याची सामाजिक किंवा वैयक्तिक कृती असते (ती सामाजिक की वैयक्तिक ही ज्याच्या त्याच्या दृष्टिकोणावर अवलंबून असते. माझ्या मते ती सामाजिक रूपातही असते आणि वैयक्तिक रूपातही असते. तिचे रूप हे निरीक्षणकर्त्याने तिचे कोणते रूप पहायचे ठरवले आहे त्यावर ठरते. हे काहीसे प्रकाश तरंगरूपात असतो आणि कणरूपातही असतो, निरीक्षणकर्त्याच्या इच्छेवर, त्याने लावलेल्या व्यवस्थेवर त्याचे रूप अवलंबून असते, तसेच काहीसे आहे. प्रत्येक कृती, प्रत्येक घटना, प्रत्येक व्यक्ती याबाबत हेच होते. ह्या गोष्टी सामाजिक की वैयक्तिक हे त्या त्या वेळच्या निरीक्षणकर्त्यावर अवलंबून आहे) तो त्याच्या कलाकृतीतून ह्या विश्वाची, त्यातील अनुभवांची एक व्यवस्था लावत असतो. पण ह्या जगात केवळ कलावंतच ह्या जगाची व्यवस्था लावत नसतात तर समाजशास्त्रज्ञ, मानसशास्त्रज्ञ, भाषाशास्त्रज्ञ वगैरे सर्वच त्यांच्या त्यांच्या पद्धतीने आणि परीने ह्या जगाची त्याविषयीच्या अनुभवांची व्यवस्था लावत असतात. ही व्यवस्था लावत असताना ह्या सर्वांच्याच संहितात्मक कृती (Textual Act) एकमेकांसमोर उभ्या ठाकत असतात. समाजशास्त्रज्ञाचे समाजशास्त्रीय ग्रंथ मानसशास्त्रज्ञासमोर, तर मानसशास्त्रज्ञाचे मानसशास्त्रीय ग्रंथ समाजशास्त्रज्ञासमोर वगैरे वगैरे. ह्यातील प्रत्येकजण ह्या संहिताना आपल्या दृष्टिकोनातून बघत असतो. (उदा. समाजशास्त्रज्ञाला मानसशास्त्रीय संहिता ह्या समाजशास्त्रीय संहिता व घटनाच वाटत असतात) आणि हे सारेच एकमेकाच्या संहिता एकमेकाच्या दृष्टिकोनातून घटना म्हणून तपासत असतात. त्यामुळे सर्वचजण समृद्ध होतात. हीच गोष्ट कलासंहितांबाबतही लागू होते. सर्व कलासंहिता ह्या समाजशास्त्रज्ञाच्या दृष्टिकोनातून समाजशास्त्रीय संहिता व घटना असतात आणि त्या कलासंहितांच्या साहाय्याने त्याच्या समाजशास्त्रीय आकलनात भर पडत असते. थोडक्यात, त्या कलासंहिता त्याच्या दृष्टीने एक साधन असते. उदा. लक्ष्मण माने यांची 'उपरा' ही जशी साहित्यिक संहिता आहे, तशीच ती समाजशास्त्रीय संहिता व घटनाही आहे. किंवा ज्ञानेश्वरी ही जरी दार्शनिक संहिता असली तरी साहित्यशास्त्रज्ञाला ती साहित्यिक संहिता म्हणून महत्त्वाची वाटते व तो तिचा तसा अभ्यास करतो. थोडक्यात, कुठलीही संहिता हे केवळ साध्य असत नाही, तर ती साधनही असते. 'उपरा' ही साहित्यिक संहिता आहे, असे एखाद्याला वाटेल; पण तिचा वापर करून समाजशास्त्रज्ञ समाजशास्त्रीय संहिता निर्माण करेल. थोडक्यात, ज्याला समाजशास्त्रीय समीक्षा म्हणतात ती साहित्य समीक्षेचे अंग नसून समाजशास्त्राचे अंग आहे. स्वतः कलावंत आपल्या लिखाणात समाजशास्त्रीय, मानसशास्त्रीय वगैरे संहितांचा बिनधास्त वापर करत असतात; पण

कुठलाही समाजशास्त्रज्ञ साहित्य म्हणजे समाजशास्त्रावर जगणारी ऐतखाऊ क्रिया असे म्हणत नाही. मग कलावंतांनीच एवढा माज का बाळगावा ? कलावंताचा कलावंत म्हणून असलेला सुपरइगो जो 'आम्ही असू लाडके देवाचे' वगैरे वगैरे भंपकबाजी करणाऱ्या रोमॅण्टिसिझममधून उगम पावलाय तो अद्याप जिवंत असल्याचेच हे लक्षण आहे. शब्दप्रामाण्य मानणाऱ्या ब्राह्मण जाणिवेचा सर्वोच्च आविष्कार म्हणजे कलावंतांचा हा इगो म्हणायला हरकत नाही. शब्दातून परमेश्वराने (?) दिलेल्या अंगणात खेळणाऱ्या केशवसुतांच्या ह्या सुतांना आपण समाजात नेमके कुठे आहोत हे न कळल्याचे हे लक्षण आहे. दुर्दैवाने मराठी संस्कृतीतही ह्या इगोला पोषक होतील अशाच घटना घडत गेल्या. उदा. मराठीत समाजशास्त्रज्ञांनी समाजशास्त्रीय समीक्षा करण्याऐवजी पढीक प्राध्यापकांनीच समाजशास्त्रीय समीक्षा लिहिली. मानसशास्त्रज्ञांनी मानसशास्त्रीय समीक्षा करण्याऐवजी ज्यांनी आयुष्यात एकही मानसिक रुग्ण हाताळला नाही अशा फ्रॉईड युंगची इकडची तिकडची पुस्तके वाचून काढणाऱ्या गृहस्थांनी मानसशास्त्रीय समीक्षा लिहिली. विद्याधर पुंडलिकांसारख्या विद्वान समाजशास्त्रज्ञालाही मराठीत समाजशास्त्रीय समीक्षा करावीशी वाटली नाही. ह्यावरून श्री. पु. भागवत संपादित सत्यकथा संप्रदायाने तत्कालिन साहित्यिकांची संवेदनशीलता कशी नेस्तनाबूत केली होती तेच सिद्ध होते. खुद्द भालचंद्र नेमाडेंसारख्या, 'कादंबरीत काळाचा आणि समाजाचा छेद असतो. कादंबरीत सामाजिक आशयद्रव्य असलेच पाहिजे' वगैरे मते असणाऱ्या गृहस्थानेही समीक्षेला ऐतखाऊ क्रिया म्हणावे हे धक्कादायक आहे आणि जवळ जवळ सर्वच देशीवादी त्यांच्याशी सहमत असल्याने ते मत अधिकच धोकादायक आहे. एकीकडे कादंबरीला, तुकारामांच्या गाथेला सांस्कृतिक दस्ताऐवज मानायचे आणि दुसरीकडे एखाद्या समाजशास्त्रज्ञाने त्याची समाजशास्त्रीय मीमांसा केली तर त्याला ऐतखाऊ क्रिया म्हणायची, ह्यातला विरोधाभास उघड आहे. असो.

ह्या सर्व पार्श्वभूमीवरून चौथी नवता कुठे उभी आहे ते सहज लक्षात यावे. चौथ्या नवतेला सर्वच संहिता साहित्यिक संहिता वाटतात हे उघड आहे. सर्वच संहिता ह्या सारख्याच असतात. ही कलाकृतीची संहिता म्हणून श्रेष्ठ आणि ही समीक्षेची संहिता म्हणून कनिष्ठ असा दुजाभाव तिच्या ठायी नाही. नेमाडेंच्या कविता, नेमाडेंच्या कादंबऱ्या आणि नेमाडेंचे 'टीकास्वयंवर' हे पुस्तक ह्यांना ती संहितेच्या पातळीवर समानच मानते. टीव्हीवरील न्यूज, टीव्हीवरील ॲड, टीव्हीवरील टॉक शो आणि टीव्हीवरील एखाद्या सिरीयलचा इपिसोड ह्या साऱ्यांना ती संहितेचा समान दर्जाच देते. ह्या संहितातला गुणवत्तात्मक फरक ती मान्य करेल, म्हणजे टॉकशोची संहिता ही टीव्ही सिरीयल इपिसोडपेक्षा अधिक चांगली होती किंवा ह्या संहितेतले आकलन त्या संहितेपेक्षा

उथळ होते वगैरे ती मान्य करेल; मात्र संहितेत कशाही प्रकारची जातिव्यवस्था लावून उतरत्या क्रमाची मांडणी करणे ती नाकारते. त्यामुळेच कथा-कादंबऱ्यांइतकाच विशाल आवाका ती दाखवू शकेल हे ती मान्य करेल. हा आकारात्मक फरक ती मान्य करेल. पण ह्या फरकाला ती मूल्यात्मक फरक मानणार नाही. सर्व मानव्यशाखांच्या संहितांना ती कलासंहिता मानेल किंवा सर्व कलासंहितांना ती मानव्यशाखेच्या संहिता समजेल. थोडक्यात, सर्व संहिता संहितेच्या पातळीवर समानच असतात असे तिचे प्रमेय असेल. ह्या प्रमेयानुसार एखादी संहिता साहित्यिक आहे की समाजशास्त्रीय आहे, की मानसशास्त्रीय आहे हे निरीक्षणकर्त्यावर अवलंबून आहे. त्याला संहिता काय स्वरूपात पाहायची आहे ते त्याने ठरवायचे आहे.

थोडक्यात, चौथ्या नवतेची सुरुवात ही समीक्षेपासून सुरू होते आहे ही नैसर्गिक घटना आहे. समीक्षेचे चौथ्या नवतेसंदर्भातील कार्य लक्षात आल्यानंतर मी समीक्षेकडे का वळलो हे कुणालाही सहज स्पष्ट व्हावे.

मी समीक्षेकडे का वळलो हे लक्षात आल्यानंतर नेमाडेंच्या समीक्षेकडे आता वळायला हरकत नाही. नेमाडेंचा समीक्षेकडे पाहण्याचा दृष्टिकोण कसा चुकला आहे हे बघितल्यानंतर प्रत्यक्ष नेमाडे ह्यांच्या समीक्षेतील गफलतीकडे वळता येईल. नेमाडेंच्या समीक्षेचे खंडन करतानाच मी माझीही समीक्षेविषयीची दृष्टी व समीक्षा मांडत जाणार आहे. चौथ्या नवतेची सुरवात ही तिसऱ्या नवतेची जी जीवनदृष्टी आहे - जिला देशीवादी जीवनदृष्टी म्हणता येईल - तिच्या खंडनापासूनच होऊ शकते. मराठीत ही जीवनदृष्टी नेमाडेंच्या लिखाणात प्रकट झाल्यानेच मी तिचे खंडन करत चौथ्या नवतेची मांडणी करत जाईन. तिची सर्वंकष दार्शनिक मांडणी मात्र मी स्वतंत्र ग्रंथात मांडेन.

